राष्ट्रीय सेवा योजना
सन २०१४ — १५ या वर्षासाठी योजनेतर सहाय्यक अनुदानासाठी संबंधित विद्यापीठाला नियमित कार्यक्रम व विशेष शिबीर कार्यक्रमाकरिता देय रक्कमेचा अनुदानाचा पहिला हप्ता ९०% मंजूर करणे व वितरणाबाबत. (फक्त अनुसूचित जाती व जमातीसाठी)

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः रासेयो २०१४/(९१/१४)/साशि-७
मंत्रालय कक्ष, एलफिन्स्टन तंत्र विद्यालय परिसर,
मुंबई ४०० ००१
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०१५

वाचा :

१) भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग, शास्त्री भवन, नवी दिल्ली यांचे क्र. जे-१२०२६/1 (III) /२०१४- एनएसएस, दिनांक २६.९.२०१४ चे पत्र शासन
२) निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. रासेयो २०१४/( ७५/१४)/ साशि-७, दि. २७.८.२०१४
३) भारत सरकार,युवा कार्य व क्रिडा विभाग, राष्ट्रीय सेवा योजना, क्षेत्रीय केंद्र, पुणे यांचे एफ. क्र.१४/२/एन.एस.आर./आर/सह./२०१४-१५४/१७६ चे दिनांक ७/७/२०१४ चे पत्र.

प्रस्तावना :

केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय सेवा योजना अंतर्गत नियमित आणि विशेष शिबीर कार्यक्रमांसाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन पत्र क्र.३ अन्वये सन २०१४-१५ वर्षाकरिता प्रवर्गनिहाय अनुक्रमे नियमित कार्यक्रमांसाठी ३,१८,१०० व विशेष शिबीर कार्यक्रमासाठी १,५९,०५० इतकी विद्यार्थी संख्या महाराष्ट्र राज्यासाठी मंजूर केली आहे. सन २०१४-१५ करिता योजनेतर सहाय्यक अनुदानासाठी नियमित कार्यक्रमासाठी ३१०१२४ व विशेष शिबीर कार्यक्रमासाठी १,५५,०६२ इतकी विद्यार्थी संख्या मागणी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार निश्चित करुन प्रवर्गनिहाय सदर विद्यार्थी संख्येस प्रशासकीय विभागाची मान्यता घेण्यात आली असून सदर विद्यार्थी संख्येचे वाटप संदर्भ क्र.२ मधील शासन निर्णयाद्वारे सर्व विद्यापीठांना करण्यांत आले आहे. विद्यापीठांना राष्ट्रीय सेवा योजनेचे उपक्रम राबविताना होणारा खर्च भागविण्यासाठी सन २०१० - ११ पासून सुधारित दराने नियमित कार्यक्रम रु. २५०/- आणि विशेष शिबीर कार्यक्रम रु. ४५०/- प्रति विद्यार्थी प्रती वर्ष या दराने सहाय्यक अनुदानाचे वितरण करण्यांत येते. राष्ट्रीय सेवा योजनेच्या तरतूदीनूसार या योजनेवरील अनुदानाच्या संपूर्ण खर्चाच्या रक्कमेची तरतूद

राज्याच्या सन २०१४ - १५ च्या अर्थसंकल्पात योजनेतर मध्ये सहाय्यक अनुदान राज्य हिस्सा रु. ६१३७९/- (हजारात) व केंद्र हिस्सा रक्कम रु. ८५९३०/- (हजारात) इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर सहाय्यक अनुदान वित्तिय अधिकार १९७८ भाग पहिला उपविभाग १ अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये मंजूर करण्यांत येत आहे. तसेच संदर्भ क्रमांक १ मधील पत्रानुसार केंद्र शासनाने या योजनरेवरील अनुसूचित जाती व जमातीच्या प्रवर्गनिहाय केंद्र शासनाच्या हिश्यापैकी ७ भाग रकमेपैकी प्रथम हप्त्याची रक्कम महाराष्ट्र शासनाकडे वितरीत केली आहे. त्यामध्ये राज्य शासनाच्या हिश्याची ५ भाग रक्कम मिळून संबंधित विद्यापीठांना सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजूर केलेल्या विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात पूर्वीच्या दराने १०० टक्के देय होणाऱ्या अनुदानाचा योजनेतरमधून सहाय्यक अनुदानाचा ९० टक्के रकमेचा प्रथम हप्ता अनु.जाती आणि जमाती या प्रवर्गासाठी मंजूर करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

वित्तीय वर्ष २०१४-१५ ला योजनेतर मध्ये दर्शविलेला संदर्भ क्रमांक २ मधील विद्यापीठांना राष्ट्रीय सेवा योजना अंतर्गत प्रवर्गनिहाय नियमित व विशेष शिबिर कार्यक्रंम राबविण्यासाठी नियमित कार्यक्रम एकूण अनुसूचित जाती ३६५९६ व अनुसूचित जमाती २९१०९ व विशेष शिबीर कार्यक्रमासाठी एकूण अनुसूचित जाती १८२९८ व अनुसूचित जमातीसाठी १४५५५ इतकी प्रवर्गनिहाय विद्यार्थी संख्या मंजूर करण्यांत आली आहे. योजनेतर अनुदानासाठी वितरित केलेली विद्यार्थी संख्या व त्यानुसार विद्यापीठाला अनुज्ञेय असणार सहाय्यक अनुदानाच्या ९० टक्के रकमेचा प्रथम हप्ता नियमित कार्यक्रमासाठी रक्कम रु.१,४७,८३,६२५/- व विशेष शिबिर कार्यक्रमासाठी रु.१,३३,०५,४६५/- अशी एकूण रक्कम रु.२,८०,८९,०९०/- इतकी आहे. सदर रक्कमेचे वितरण केंद्र व राज्य शासन यांच्या अनुदानातून ७:५ या प्रमाणात करण्यांत येते.

यापैकी केंद्र हिस्सा रक्कम रु.१,६३,८५,३०३/-(रुपये एक कोटी,त्रेसष्ट लाख , पंच्याऐंशी हजार, तीनशे तीन फक्त) व राज्य हिस्सा रक्कम रु. १,१७,०३,७८७/- (रुपये एक कोटी, सतरा लाख,तीन हजार , सातशे सत्त्याऐंशी फक्त ) एवढी योजनेतर अनुदानाच्या रक्कमेस मासिक विवरण पत्राच्या अनुदानास अधिन राहून वितरणास मंजूरी देण्यात येत आहे. (विद्यापीठांना देय रक्कमेचा तपशिल सोबतच्या परिशिष्ट "अ" आणि "ब" मध्ये दिलेला आहे.)

विद्यापीठाला सन २०१४ - १५ मधील सहाय्यक अनुदानाच्या १००% देय रक्कमेपैकी देय ९०% रकमेचा पहिला हप्ता (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीसाठी) वितरीत करण्यासाठी उच्च व तंत्र शिक्षण विभागाने राष्ट्रीय सेवा योजनेसाठी सन २०१४- १५ या वर्षातील अनुदान वितरणासाठी अर्थसंकल्पामध्ये मंजूर केलेल्या तरतूदीनुसार योजनेतर मध्ये

सहाय्यक अनुदान राज्य हिस्सा रु. ६१३७९/-(हजारात) व केंद्र हिस्सा रक्कम रु.८५९३०/-(हजारात) या रक्कमेतून मंजूर केलेल्या योजनेत्तर अनुदानाच्या वितरणासाठी स्वतंत्र देयके तयार करुन ती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई या कार्यालयाकडे सादर करावीत. या आदेशातील अनुदानाच्या रक्कमेच्या देयकावर स्वाक्षरी करण्याचे प्राधिकार या विभागाचे श्री.सं.श.चौबळ, कक्ष अधिकारी (लेखा) यांना प्रदान करण्यांत येत आहेत. तसेच या देयकावर नियंत्रण अधिकारी म्हणून श्रीमती रो. स.भालेकर, उप सचिव (लेखा) हे प्रतिस्वाक्षरी करतील. अशा प्रकारे अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत केलेली अनुदानाची रक्कम या कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांच्यार्फत संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव यांना वितरीत करण्यात येईल. सदर विद्यापीठाने महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई आणि महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर तसेच या विभागाला अथवा त्याच्या प्रतिनिधीला राष्ट्रीय सेवा योजनेच्या अनुदानाचे सर्व लेखे तपासणी करिता सादर करावेत. तसेच सन २०१३-१४ या आर्थिक वर्षासाठी वितरीत केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र व प्रमाणित लेखे विनाविलंब या विभागाला सादर करावेत.(चार विद्यापीठे) तसेच सन२०१४-१५ साठी शासन निर्णय क्र.रासेयो २०१४/प्र.क्र.७५/१४/साशि ७, दिनांक २७.८.२०१४ नुसार विद्यापीठांना वाटप करण्यात आलेल्या अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या विद्यार्थी संख्येनुसार विद्यापीठांनी महाविद्यालयांना सहायक अनुदानाचे वाटप करावे. राष्ट्रीय सेवा योजना विद्यापीठांतर्गत असलेल्या महाविद्यालयास प्रवर्गनिहाय सहायक अनुदान वाटप करण्यात आल्यानंतर त्या महाविद्यालयाचे सहायक अनुदान वाटप विवरणपत्र शासनास त्वरित पाठवावे.

यासाठी होणारा खर्च **सन २०१४ - १५** या वर्षासाठी तरतूद केलेल्या मंजूर अनुदानातून पुढे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**योजनेतर (Non-Plan) केंद्र हिस्सा अनुदानाचे लेखाशिर्ष आणि रक्कम**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग
मागणी क्रमांक डब्ल्यू - ६
२२५१ - सेक्रेटरीएट - सामाजिक सेवा
०९० - सेक्रेटरीएट -
(०२) राष्ट्रीय सेवा योजना -
(०३) (०१) राष्ट्रीय सेवा योजना
(२२५१ ०६८८) (योजनेतर) (केंद्र हिस्सा)
३१ - सहाय्यक अनुदान **रु. १,६३,८५,३०३/-**
(अक्षरी रुपये एक कोटी,त्रेसष्ट लाख पंच्याऐंशी-
हजार तीनशे तीन फक्त)

**योजनेतर (Non-Plan) राज्य हिस्सा अनुदानाचे लेखाशिर्ष आणि रक्कम**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

मागणी क्रमांक डब्ल्यू - ६

२२५१ - सेक्रेटरीएट - सामाजिक सेवा

०९० - सेक्रेटरीएट -

(०२) राष्ट्रीय सेवा योजना -

(०२) (०१) राष्ट्रीय सेवा योजना

(२२५१ ०३३८) (योजनेतर) (राज्य हिस्सा)

३१ - सहाय्यक अनुदान रु. १,१७,०३,७८७/-

(अक्षरी रुपये एक कोटी, सतरा लाख,तीन हजार-

- सातशे सत्त्याऐशी फक्त)

**एकूण रककम - रु २,८०,८९,०९०/-**

**(अक्षरी रुपये दोन कोटी ऐशी लाख एकोणनव्वद हजार नव्वद फक्त)**

योजनेत्तर मधील उपरोक्त रकमेला वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३३६ /व्यय-५, १५ डिसेंबर, २०१४ अन्वये मान्यता घेण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९११५४१०५८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Hansra Salunkhe

Digitally signed by Atul Hansra Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Atul Hansra Salunkhe
Date: 2015.02.09 12:05:22 +05'30'

( डॉ. अतुल साळुंके )

राज्य संपर्क अधिकारी/विशेष कार्य अधिकारी

**प्रति,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र - १, मुंबई

४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र - २, नागपूर

५) अवर सचिव, भारत सरकार, संस्कृती, युवा कार्य व क्रिडा मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली (पत्राद्वारे)

६) सहाय्यक कार्यक्रम सल्लागार, राष्ट्रीय सेवा योजना विभागीय केंद्र, पुणे
७) सर्व संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव / संचालक
८) सर्व संबंधित विद्यापीठाचे / संचालनालयाचे राष्ट्रीय सेवा योजना विभागाचे कार्यक्रम समन्वयक
९) वित्त विभाग (व्यय - ५), वित्त विभाग, (अर्थसंकल्प ८)
१०) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, साशि - १/ लेखा शाखा /
११) निवड नस्ती साशि- ७